राज्यातील खरीप- २०१८ हंगामातील दुष्काळी परिस्थितीच्या अनुषंगाने बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१९/प्र.क्र.१०/म-११**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - १४ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७,दिनांक ३१/१०/२०१८
२) शासन निर्णय,क्रमांक:- सीएलएस २०१५/प्र.क्र.४०/म-३,दिनांक १३/०५/२०१५.
३) शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१९/प्र.क्र.१९/म-७,दिनांक २५/०१/२०१९.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९/०१/२०१९ व दिनांक ३१/०१/२०१९.
५) शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७,दिनांक १३/०२/२०१९.

**प्रस्तावना :-**

दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ नुसार जिल्ह्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करुन राज्यातील १५१ तालुक्यांमध्ये गंभीर / मध्यम स्वरुपाचा दुष्काळ जाहीर करण्यात आला आहे. सदर १५१ तालुक्यांमधील दुष्काळी परिस्थितीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी **दुसऱ्या हप्त्याचा निधी** अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (Beams) उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील खरीप हंगाम २०१८ मध्ये संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दुष्काळ जाहीर करण्यात आलेल्या राज्यातील १५१ तालुक्यांमधील शेतीपिकांच्या झालेल्या पीक नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदानाचे वाटप करण्यासाठीचा निर्णय संदर्भ क्रमांक ०३ येथील दिनांक २५/०१/२०१९ अन्वये घेण्यात आला. त्यानुसार रुपये २९०९५१.०९ लक्ष (रूपये दोन हजार नऊशे नऊकोटी एकावन्न लक्ष नऊ हजार फक्त) इतका निधी दोन हप्त्यामध्ये वितरित करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार कोकण/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर/पुणे विभागास प्रथम हप्त्याचा निधी उपरोक्त शासननिर्णय दिनांक २९/०१/२०१९ रोजी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. आता, उपरोक्त संदर्भ क्रमांक ०५ येथील दिनांक १३/०२/२०१९ च्या शासननिर्णयान्वये दुष्काळी निधीच्या मदत वाटपामध्ये बाधा येऊ नये यासाठी उपरोक्त संदर्भ क्रमांक ३ येथील शासननिर्णयात परिच्छेद क्रमांक १२ मधील उपपरिच्छेद क्रमांक ३ मधील "तसेच केल्याचे प्रमाणपत्र व किमान ८०% निधीचा विनियोग केल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील हप्त्याची मागणी तात्काळ शासनाकडे करण्यात यावी" ही अट शिथिल करुन दुसऱ्या हप्त्याच्या निधीचे वाटप करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे दुसऱ्या हप्त्यापोटी एकूण रुपये २९०९५१.०९ लक्ष (रूपये दोन हजार नऊशे नऊकोटी एकावन्न लक्ष नऊ हजार फक्त) **पैकी दुसरा हप्ता रुपये १४५४,७५,५४,६८०/- (एक हजार चारशे चौपन्न कोटी, पंचाहत्तर लक्ष चौपन्न हजार सहाशे ऐंशी फक्त)**

इतका निधी या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रातील **स्तंभ क्रमांक आठ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी विधानमंडळाच्या सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झाला असून या मधून बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

४. उपरोक्त निधी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात "मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य (योजनेत्तर), ०१ अवर्षण, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांनुसार खर्च, (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), **(२२४५ २४३४)** या उपलेखाशिर्षाखाली" अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून विभागीय आयुक्त, कोकण/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर/पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे, सदर शीर्षाखाली तो अंतीमत:खर्ची दाखविण्यात यावा. तसेच सोबतच्या सहपत्रात दर्शविल्याप्रमाणे निधी वाटपाच्या मर्यादेतच संबंधित जिल्ह्यांना निधी वितरीत होईल व **सदर रक्कम ३१ मार्च, पूर्वी खर्ची पडेल याची कृपया दक्षता घ्यावी.**

५. **बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करताना शासननिर्णय संदर्भ क्रमांक १, ३ व ५ मधील अटी, शर्तीची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी व त्यात नमूद मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.**

६. जिल्हयांना दुसरा हप्ता वितरीत केल्यानंतर संबंधित जिल्हयांनी रक्कम वाटप करण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी, त्यांना प्रदान केलेल्या रकमेच्या माहितीसह, त्या-त्या जिल्हाधिकारी कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी. तसे केल्याचे प्रमाणपत्र व प्राप्त निधीचा विनियोग केल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्रासह अहवाल शासनाकडे एप्रिल,२०१९ च्या पहिल्या आठवडयात पाठवावा.

७. **अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) वर उपलब्ध निधी अनावश्यक रितीने कोषागारात आहरीत करुन तो वाटपा अभावी बँकेत पडून राहणार नाही, याची काटेकोर दक्षता घेण्याचे आदेश वेळोवळी देण्यात आलेले आहेत, असे असतानाही कोषागारातून रक्कम आहरीत करुन बँकेत ठेवले असल्याच्या बाबी निदर्शनास आल्या आहेत. यास्तव निधी आहरीत करुन बँकेत ठेऊ नये, अशा सक्त सूचना या शासन निर्णयान्वये पुन:श्च देण्यात येत आहेत. अशी बाब आढळून आल्यास त्याला तात्पुरता अपहार समजून, संबंधितांवर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची सर्वांनी नोंद घ्यावी.**

८. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची सर्व विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख/ नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यत संबंधित विभागीय आयुक्त, यांनी एकत्रित महसूल व वन विभागास न चुकता सादर करावी तसेच झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे **उपयोगिता प्रमाणपत्र** या विभागाकडे तात्काळ सादर करावे. वितरीत करण्यात

आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

९. नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित व्यक्तींना वाटप करण्यासाठी वितरित करण्यात येणारा निधी तालुकास्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तांतरित केला जातो. काही बँका लाभार्थ्यांचे नाव, खाते क्रमांक जुळत नाही, अशा तांत्रिक कारणास्तव परत आलेला निधी निलंबन (Suspense) खात्यात ठेवतात. वास्तविक पाहता बँकाकडे वर्ग करण्यात आलेली रक्कम एकतर लाभार्थ्यांच्या खात्यात जमा होणे आवश्यक आहे किंवा परत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात जमा होणे आवश्यक आहे. तथापि, आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात अशा रकमा जमा करण्याऐवजी बँका त्या निलंबन खात्यामध्ये ठेवतात, कालांतराने अशा रकमा ताळमेळविना राहतात आणि ज्या रकमा शासनाकडे परत जमा व्हावयास हव्या त्या बँकाकडे पडून राहतात. याला आळा घालण्यासाठी ठराविक कालावधीने सदर रकमांचा ताळमेळ घेणे अत्यंत गरजेचे आहे. तरी सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी दर आठवडयाला यापूर्वी वर्ग करण्यात आलेल्या व यानंतर वर्ग करण्यात येणाऱ्या रकमांचा ताळमेळ घेण्याची कार्यवाही करावी.

१०. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उप कोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/उप कोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१५१४४८१२१२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE
MILIND RAUT

Digitally signed by RAJASHREE MILIND RAUT
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=58e3cf7b9657c2ed6d6d47f01918bccb8dcaac1f1b6f31c7c723db4deb16f5f2, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=6689500497ea8c2084eb7b303b8b2f3922ec7b73b6347d04e043dc0b8ef0fd64, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=RAJASHREE MILIND RAUT
Date: 2019.02.15 14:52:29 +05'30'

**( राजश्री राऊत )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
२. सर्व लोकसभा सदस्य / राज्यसभा सदस्य (महाराष्ट्र )
३. सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य.
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव
५. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय,मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (महसूल), महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

८. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन),मंत्रालय,मुंबई
९. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
१०. आयुक्त ( कृषि ),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. महालेखापाल -१ /२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई / नागपूर
१२. महालेखापाल -१ /२ ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र , मुंबई / नागपूर
१३. सर्व विभागीय आयुक्त
१४. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासन भवन,मुंबई
२०. वित्त विभाग, व्यय -९ / अर्थसंकल्प कक्ष / अर्थोपाय कक्ष ), मंत्रालय, मुंबई.
२१. महसुल व वन विभाग, (म-७ / म-११ / म-३), मंत्रालय, मुंबई-३२
२२. निवड नस्ती, कार्यासन म-११.

## शासन निर्णय, क्रमांक : एससीवाय-२०१९/प्र.क्र.१०/म-११, दिनांक : १४ फेब्रुवारी, २०१९ चे सहपत्र (दुसरा हप्ता)

(रक्कम रू. कोटीत)

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | शेतीपिकांच्या नुकसानीसाठी देय मदत | बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदत | एकूण मदतीची रक्कम | वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असलेली रक्कम | दुसऱ्या हप्त्याची उर्वरित रक्कम (रकाना क्र. ७ च्या ५०%) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | **कोकण** | पालघर | ३४.४९ | ० | ३४.४९ | १४.१२७१०४ | ७.०६३५५२ |
| **एकूण कोकण** | | | **३४.४९** | **०** | **३४.४९** | **१४.१२७१०४** | **७.०६३५५२** |
| २ | | नाशिक | ३५१.११ | ६५.२१ | ४१६.३२ | १७०.५२४६७२ | ८५.२६२३३६ |
| ३ | | धूळे | २७७.६० | ८.३९ | २८५.९९ | ११७.१४१५०४ | ५८.५७०७५२ |
| ४ | **नाशिक** | नंदूरबार | २०३.४४ | ४.६६ | २०८.१० | ८५.२३७७६ | ४२.६१८८८ |
| ५ | | जळगांव | ५६७.४३ | १८.०० | ५८५.४३ | २३९.७९२१२८ | ११९.८९६०६४ |
| ६ | | अहमदनगर | ५७३.६८ | ११०.५८ | ६८४.२६ | २८०.२७२८९६ | १४०.१३६४४८ |
| **एकूण नाशिक** | | | **१९७३.२६** | **२०६.८४** | **२१८०.१** | **८९२.९६८९६** | **४४६.४८४४८** |
| ७ | | पुणे | २४४.८४ | १५.१२ | २५९.९६ | १०६.४७९६१६ | ५३.२३९८०८ |
| ८ | **पुणे** | सोलापूर | ३५२.३५ | १२४.६७ | ४७७.०२ | १९५.१८६१९२ | ९७.५९३०९६ |
| ९ | | सातारा | ९६.९५ | ७.३५ | १०४.३० | ४२.७२१२८ | २१.३६०६४ |
| १० | | सांगली | १३०.०३ | ३७.९७ | १६८.०० | ६८.८१२८ | ३४.४०६४ |
| **एकूण पुणे** | | | **८२४.१७** | **१८५.११** | **१००९.२८** | **४१३.१९९८८८** | **२०६.५९९९४४** |
| ११ | | औरंगाबाद | ४४६.७७ | ९८.३६ | ५४५.१३ | २२३.२८५००० | १११.६४२५ |
| १२ | | जालना | ४१३.९० | ६४.१३ | ४७८.०३ | १९५.८०१०८८ | ९७.९००५४४ |
| १३ | | बीड | ५८१.०७ | ३८.७६ | ६१९.८३ | २५३.८८२३६८ | १२६.९४११८४ |
| १४ | **औरंगाबाद** | लातूर | १६.२१ | ० | १६.२१ | ६.६३९६१६ | ३.३१९८०८ |
| १५ | | उस्मानाबाद | ३२५.५० | १६.२१ | ३४१.७१ | १३९.९६४४१६ | ६९.९८२२०८ |
| १६ | | नांदेड | १२४.६४ | १.१२ | १२५.७६ | ५१.५११२९६ | २५.७५५६४८ |
| १७ | | परभणी | २५७.२६ | ५.३० | २६२.५६ | १०७.५४४५७६ | ५३.७७२२८८ |
| १८ | | हिंगोली | १७५.६८ | ० | १७५.६८ | ७१.९५८५२८ | ३५.९७९२६४ |
| **एकूण औरंगाबाद** | | | **२३४१.०३** | **२२३.८८** | **२५६४.९१** | **१०५०.५८६८८८** | **५२५.२९३४४४** |
| १९ | | बुलडाणा | २८६.०६ | २.८२ | २८८.८८ | ११८.३२५२४८ | ५९.१६२६२४ |
| २० | | अकोला | १९६.३९ | २.७२ | १९९.११ | ८१.५५५४५६ | ४०.७७७७२८ |
| २१ | **अमरावती** | वाशिम | ६२.४९ | १.३३ | ६३.८२ | २६.१४०६७२ | १३.०७०३३६ |
| २२ | | अमरावती | १८६.१५ | ८३.५० | २६९.६५ | ११०.४४८६४ | ५५.२२४३२ |
| २३ | | यवतमाळ | ३३६.६५ | ० | ३३६.६५ | १३७.८९१८४ | ६८.९४५९२ |
| **एकूण अमरावती** | | | **१०६७.७४** | **९०.३७** | **११५८.११** | **४७४.३६१८५६** | **२३७.१८०९२८** |
| २४ | | वर्धा | १४.६२ | ० | १४.६२ | ५.९८८३५२ | २.९९४१७६ |
| २५ | **नागपूर** | नागपूर | ८२.३८ | ० | ८२.३८ | ३३.७४२८४८ | १६.८७१४२४ |
| २६ | | चंद्रपूर | ५९.९० | ० | ५९.९० | २४.५३५०४ | १२.२६७५२ |
| **एकूण नागपूर** | | | **१५६.९०** | **०** | **१५६.९०** | **६४.२६६२४** | **३२.१३३१२** |
| **एकूण राज्य** | | | **६३९७.५९** | **७०६.२०** | **७१०३.७९** | **२९०९.५१०९३६** | **१४५४.७५५४६८** |